म्हणून कोणत्याही गोष्टीचा राग नाहीं. कशाला असेल ? प्रत्यक्ष स्वतःची कितीही वेळां मानहानि झाली तरी जे निरंतर त्वाविद्‌चरणारविंदीं लोळणारे, त्या बापड्यांचें नाना फडनवीसास कोणी गाढव म्हटलें म्हणून काय गेलें ? नाना फडनवीस कोण हें अगोदर पुरतें माहीत असेल तर मग त्याच्याविषयीं राग किंवा लोभ !

तर ' लोकहितवादीं ' च्या लेखांवर गेल्या वर्षभर जी आह्मी शिस्त धरली त्यांत गैरशिस्तपणाचा प्रकार बिलकुल नाहीं अशी आमची पक्की खातरी आहे. आतां ते वयानें येवढे पोक्त झालेले आहेत, व आजपर्यंत मोठमोठे सरकारी हुद्दे वहिवाटून हल्लीं खुद्द गवर्नर साहेबांच्या खुर्चीशीं खुर्ची लावून बसण्यापर्यंत त्यांचा बडेजाव वाढला आहे, तसेंच लोककल्याणाच्या कामींही त्यांनीं आजपर्यंत पुष्कळ मेहनत केली असून हल्लींही ती खळली नाहीं; या सर्व गोष्टी खऱ्या आहेत; पण यांपैकीं एकही प्रस्तुत प्रकरणास बिलकूल लागू नाहीं. वाग्देवीच्या मुलखांतला कायदा असा आहे कीं, त्यांत पाऊल ठेवतांच सर्वांचीं वयें सारखीं होऊन जातात, त्यांचे हुद्दे एक होतात, व उच्चनीचभावाला तेथें कोणताच थारा राहत नाहीं. हौद्यांत उडी टाकल्याबरोबर दोघे मल्ल जसे समवयस्क होतात, समरांगणावर मोठे रूमशामचे बादशाहा सारखे व सात रुपयांचा हलहप शिपाई जसा सारखा, किंवा रतिनायक हा जसा ज्ञातिभेदास न ओळखून ' पंडितराजराजितिलका ' सारख्या महाब्राह्मणासही ' यवनी नवनीतकोमलांगी ' हा ध्यास लावायाला चुकत नाहीं, त्याप्रमाणेंच सरस्वतीच्या साम्राज्यांतील हालहवाल आहे ! रोमन लोकांत अशी चाल असे कीं, फौजेवर ज्याची हुकमत चालते आहे, व जो लढाया मारून विजयी होऊन आला आहे, अशा सरदारासही पुनः जर ' कॉन्सल ' हा हुद्दा पाहिजे असेल, तर त्यानें इतर उमेदवारांप्रमाणें साधा पांढरा पोषाक करून लोक समाजांत येऊन हजर व्हावें, आणि मग त्याच्याकडे जर बहुमत पडलें तर तो हुद्दा त्यास मिळावयाचा; दरम्यान नाहीं. तर विद्वत्समाजांतीलही हीच व्यवस्था आहे. तेथें रावबहादुरीला कोणी विचारीत नाहीं; व नामदारीचीही कोणी किंमत समजत नाहीं; आपला ग्रंथ आणून लोकांपुढें टाकावा, मग त्यांतील मजकुराच्या योग्यतेवरून त्याचा काय दर लागेल तो लागेल ! ग्रंथकारावरून कोणी ग्रंथाची परीक्षा करीत नाहींत, तर ग्रंथावरून ग्रंथकाराची करीत असतात !

आतां कित्येक कदाचित् असेंही ह्मणतील कीं, जर 'लोकहितवादीं' नीं आपण होऊन तुह्मांकडे आपले ग्रंथ पाठविले होते तर त्यांवर इतका

ण्याची शक्ति होती त्याप्रमाणें मराठी राज्यांत दुसरे कोणासही नव्हती. सकाळपासून मध्यरात्रीपर्यंत एक क्षण व्यर्थ न जाऊं देतां सर्व काळ ते सरकारी काम करीत. त्यांत हिशेब किती लिहीत, जावसाली पत्रें व बातमीचीं पत्रें किती लिहीत, खलबतें आणि मसलती किती करीत, त्याचा सुमार नव्हता; व इतकें काम होण्याकरितां त्यांची वेळेची व्यवस्था फार चांगली असे. वडबड किंवा वायकळ अगर पोकळ गोष्ट ते कधीं बोलले नाहींत, व त्यांनीं कधीं ऐकिली नाहीं; व त्यांचे घरांत फार मंडळी नसे, व स्वारीचा डौल नसे, एकांताची त्यांस फार प्रीति होती, कामावांचून त्यांचे घरीं कोणी जात नव्हतें व कामावांचून कोणाची भेट होत नव्हती. त्यांचे हाताखालीं फडावर ७०० कारकून होते व तेथें जावसाली, राजकीय, हिशेबी व चिटणिशी लिहिणें पुष्कळ असे. मराठी राज्याची रचना अशी होती कीं, सरकारची आप्तमंडळी व पदरची मंडळीही सरकारांत खासगत वाड्यांत राहात असे. शिवाय सरकारसंबंधाचीं माणसें दोन प्रकारचीं, मुत्सद्दी व सरदार. प्रत्येक सरदाराजवळ मुत्सद्दी होते. त्यांचीं नांवें, फडणीस, पोतनीस, मुजुमदार, दिवाण, हसबनीस, दप्तरदार वगैरे. याप्रमाणें लोक प्रत्येक सुभ्याचे निसबतीस असत. व त्यांस दरकदार असें ह्मणत. सातारचे हुजुरचे दरकदार यांनीं पुण्याचे दरकदार नेमावे, व पुण्याचे दरकदार यांनीं प्रांतांत व महालांत दरकदार नेमावे असा दस्तुर होता. सरदारांत पटवर्धन, रास्ते, पवार, धुळप, आंग्रे, विंचुरकर वगैरे सरंजामी सरदार असत. शिवाय पागे, पथकी, किल्लेदार, शिलेदार वगैरे सरदार होते. प्रत्येकांस गांव व कुरणें तोडून दिलीं होतीं. दरएक सरदाराकडे दरकदार असत त्यांनीं जमाखर्चा व जावसाली लिहिणें लिहावें; आणि अधिक उणें हुजुरास कळवावें. पुण्यापासून ५० कोशांचे आंत मोठाले गवताचे व पाण्याचे गांव पाहून त्याठिकाणीं पागा असत. भिवरथडी, इंद्रायणीतिर, गंगथडी इत्यादि ठिकाणीं घोडीं व स्वार राहिल्यानें खर्च थोडा पुरे, व स्वारास आणि जनावरांस आराम असे. काम लागल तेव्हां बोलावून नेत. तसेंच जेथें किल्ले आहेत तेथें त्यांवर गडकरी लोक शेतसनदी शिपाई ठेवीत. शिवाय सबनीस, हवालदार, सरनोबत, किल्लेदार वगैरे अंमलदार असत. त्याचप्रमाणें पागांत व पथकांत डंके, निशाणें, बिनी, व ढाल याप्रमाणें नेमणूक असे. मोठे सरदारास नौबती, चौघडे असत. व आणखी बक्षी, हजीरनीस, तबीब, जिनसीवाले यांची नेमणूक असे. होळकर हे माळव्याचे सुभेदार. त्याचप्रमाणें गुजराथचे सरसुभे, वसई व साष्टी हे कोंकणचे सरसुभे, कर्नाटकचे सरसुभे असे विभाग होते. दर सुभ्याखालीं कित्येक मामलती व कमाविशी व किल्ले असत.

सुभा हा लष्करी अंमलदार, तो स्वार, तोफा वगैरे बाळगून महालांत स्वस्थता राखी. त्याचि दरकदार व जमीदार मिळून मुलकी काम करीत. दरकदाराची बहाली अगर बरतर्फी सुभ्याकडून होत नव्हती. हुजुराहून होत होती. पेशवे हे साताराचे मुख्य प्रधान; ह्मणून राज्यकारभार करीत. वास्तव दर पिढीस साताऱ्यास जाऊन वस्त्रें घेत, व पुण्यास फडणीस, मुजुमदार होते ते साताऱ्याहून नेमलेले असत, व पुण्याचे दरकदारांनीं हरएक सुभ्याजवळ व सरदाराजवळ दरकदार नेमावे. या जागा बहुत-करून वंशपरंपरा होत्या, व त्यांस उत्पन्नाकरितां महालचे जमाबंदीवर शेकडे बांधून दिले होते तेंच वेतन. याप्रमाणें असल्यामुळें या जागा मोठ्या प्राप्तीच्या असत. व याजमुळें नानाफडणीसाकडे फडणिशीच्या जागा भरण्याचें काम असे. जितके फडणीस तितके सर्व नानाकडून नेमले जात. मोठे घराण्यांत एक सरदार असे. त्याचा भाऊ विंचुरकराकडील फडणीस असे. तिसरा गुजराथेंत दरकदार असे. चौथा किल्ल्याचा सबनीस असे. याप्रमाणें एक एकाच्या घरांत दहा दहा रोजगार असत. रास्ते, पटवर्धन वगैरे जीं मोठालीं घराणीं, त्यांत तर कोणीच रिकामा नसे. नानाचें वेतन दाहा हजार रुपये दरसाल होतें, परंतु कारकुनी, दरक मिळून दहा लाख रुपये मिळत. या नेमणुका सरकारमहशूर होत्या, सबब लांच नव्हते. शिंद्यासारखे सरदार आपले मुलखाचे हिशेब पेशव्यास देत व फडणिसाची मसलाशी त्याजवर होण्याचें अगत्य असे, तेव्हां त्यांचे जमाबंदीवर हुजुरचे दरकदाराची प्राप्ती पन्नास हजार, सत्तर हजार येई. त्यांतील कांहीं फडणीस घेत. कांहीं मुजुमदार घेत. याप्रमाणें वांटणी होत असे. पेशव्यांच्या स्वाऱ्या, मोहिमा व मुलुखगिऱ्या दरसाल होत. त्यांतून कांहीं खुद्द व कांहीं सरदार मार्फत होत; तेव्हां त्यावेळेस जे शिपाई प्रसिद्धीस येत त्यांस सरदाऱ्या मिळत. पानशे, पटवर्धन वगैरे नामांकित सरदार यांचे घरचे दहा दहा वीस वीस पुरुष सरकार कामावर मेले होते, याजमुळें त्यांवर सरकारची फार कृपा असे. यात्तेरीज विदेशी लोक चाकरीस असत; त्यांजवरील आरबांचे सरदार, शिद्दी सरदार, पठाणाचे सरदार, गार्दी सरदार, गोमांतकी फिरंगी सरदार, वगैरे हे निराळेच असत. नानाफडणिसाचे कारकीर्दीस हे सरदार; पागा, किल्ले, आठरा कारखाने, इत्यादि फार तयारींत असत. एक वेळ बाजिरावानें असें मनांत आणिलें कीं, पानशे यांचा सरंजाम जप्त करावा; तेव्हां गणपतराव भाऊंनीं श्रीमंतास मेजवानी केली, आणि आंचवावयास जाण्याचे वाटेवर १८ विधवांचीं पानें मांडलीं. पुढें जेव्हां श्रीमंत आंचवावयास जाऊं लागले तेव्हां गणपतरावभाऊनीं विनंति केली कीं, या स्त्रिया पाहाव्या;

या इतक्यांचे भ्रतार सरकारची दौलत राखण्याकरितां मेले आहेत ! असें असतां सरकारांतून जमीचा विचार झाला हें काय? तेव्हां बाजीरावास आश्चर्य वाटून त्यानें अभय दिलें.

तसेंच पूर्वी दादासाहेब राक्षसभुवनचे लढाईस गेले होते; तेव्हां तळेगांवीं जाऊन ढमढेरे यांजकडून कोण लढाईस येणार ह्मणून त्यांनीं विचारलें. तेव्हां ढमढेरे यांचे कुळांत एक बाई व एक १५ वर्षांचा मुलगा मात्र राहिला होता. तेव्हां त्या बाईनें दादासाहेबांस सांगितलें कीं आमचा कोणी पुरुष तुमचेबरोबर नसल्यास आमचे कुळाचें नांव जाईल, याजकरितां एवढा मुलगा आहे हा बरोबर अगत्य न्यावा. जर त्यास वडिलांची शरम असेल तर तो कांहीं सरकारांत काम करून भूषणास येईल. तेव्हां तो मुलगाही हौसेनें लष्करावरोबर गेला. आणि राक्षसभुवनावर दादासाहेबांचे समक्ष ठार झाला. पुढें स्वारी परत आली तेव्हां दादासाहेब त्या बाईकडे भेटीस गेले आणि त्यांनीं तिला सांगितलें कीं मुलगा तर मेलाच, परंतु आतां मी तुमचा मुलगा आहें असें समजून समाधान माना. आणखी एकवेळ असें झालें कीं झुंझारराव घोरपडे व बाजी घोरपडे यांचा मलवडी व बुध या परगण्याचे देशमुखीविषयीं वाद लागला; आणि थोरले माधवरावसाहेब यांजकडे उभयतां आले; त्या प्रसंगीं रामशास्त्री यांणीं दोन चार वेळ गोष्ट काढिली परंतु श्रीमंतांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं, ह्मणून तो वाद तसाच राहिला. पुढें धारवाड घेण्याकरितां स्वारी निघाली, तेव्हां वादी प्रतिवादी यांस भाऊबंदसुद्धां बोलविलें, आणि लढाईत किल्ल्यावर शिड्या लावून हल्ला करावयाचें ठरलें. तेव्हां उभयतां पक्षकारांस श्रीमंतांनीं सांगितलें कीं, आतां बुरजांवर जो निशाण चढवील तो देशमुख खरा, असें ऐकतांच उभय पक्षांनींही मोठ्या निकरानें युद्ध केलें. त्यांत बाजीचे पन्नास पुरुष ठार मेले. झुंझारराव यांणीं किल्ला सर केला; तेव्हां निर्विवाद होऊन देशमुखीच्या सनदा झाल्या. याचप्रमाणें मोतीतलावाचे लढाईत पटवर्धनाचे १७ पुरुष एकदम मेले. त्याचें कारण असें झालें कीं, त्रिंबकरावमामा पेठे हैदर नायकावर गेले. इतक्यांत गोविंद हरी वारले. तेव्हां मामांनीं पुण्यास पत्र लिहिलें कीं, गोविंदपंत वारले, मागें पोरेंबाळें उरलीं आहेत, तेव्हां त्यांच्या हातून काम कसें होईल? हें वर्तमान गोविंद हरीचे चौघा मुलांस व पांच भावांस कळलें; तेव्हां त्यांणीं मामास सांगितलें कीं, उद्यांची लढाई आह्मांकडे द्यावी, आणि आपण उगीच पहात असावें. आणि त्याप्रमाणें त्या दिवशीं सर्व पटवर्धन मंडळीनें विडे उचलले कीं, आज नांव जातें याजकरितां मामांची खात्री केली पाहिजे. मग संध्याकाळचे

लागे. मोठमोठे सावकार यांजकडे महालाचा निश्या, रसदा, भरणें वगैरे काम असे; याजमुळें त्यांची सरकारांत मोठी वजनदारी असे. दरकदारास किताब नव्हते. त्यांचे दरकाचीं नांवें फडणीस, मुजुमदार अशीं होतीं; तींच चालत. सरदार लोकांस किताब बहुत होते. विश्वासरावें हा किताब सुपेकर पवारास होता. झुंझारराव, सरजेराव, घोरपडे, नामजाद हा किताब खानवेलकर व माणकर, यांणीं कोंकण प्रांत सर केला, त्यांस आहे. शिवाय रणनवरे, फांकडे, सरखेल, तरवारबहादुर, इत्यादि शेंकडों किताब होते. व त्या किताबांचे लवाजिमे होते. आतां सरदारांपैकीं बहुत प्रसिद्ध आहेत. तसेंच मुत्सद्यांपैकीं, रामशास्त्री न्यायाधीश, नारो बाबजी नगरचे सरसुभे, नारो आपाजी पुण्याचे सुभेदार, विसाजीपंत लेले वसईचे सुभेदार, रामाजी महादेव साष्टीचे सुभेदार, इत्यादिकांची कीर्ति अद्याप चालत आहे. अहिल्याबाईनें स्वतः ४० वर्षें राज्य केलें व तिच्या शब्दास श्रीमंत पेशवे, शिंदे, भोंसले, सर्व मानीत; व भिल्ल, कोळी, देखील तिला आई समजत. याजवरून त्या काळीं लोक अगदीं वाईट होते अशी कितीएकांची समजूत आहे ती अशुद्ध आहे असें समजावें. पेशवाईचे अखेरीस मात्र बाजिरावाचा अंमल झाला त्यांत वीस वर्षेंपर्यंत सतत दंगे, बंडें, काळ, अवर्षणें पडून मुलूख उजाड झाला, व गांवचे गांव बेचिराक झाले. वीस वर्षेंपर्यंत सरकार नाहींसें झालें. दफतर, फड वगैरे सर्व कचेऱ्या बंद पडल्या. आणि भट व बायका यांचा गोंधळ माजला. ही गोष्ट खेरीज; परंतु या दुष्टत्वाचे पूर्वीं मराठी राज्य फार आबादान होतें; व दक्षिणेंत द्रव्य फार होतें. अस्तु. देशांत प्रसिद्धपणा पावण्याचीं स्थळें असलीं पाहिजेत. विलायतेंत पार्लमेंट आहे तें तसेंच स्थल आहे. सांप्रत या देशीं असें स्थल नाहीं ही एक मोठी कमताई आहे. आतां कोणी ह्मणतील कीं फडाप्रमाणें हल्लींचीं कोडतें आहेत त्यांत वकिली करून प्रसिद्ध व्हावें. वैद्यशाळा आहेत त्यांत विद्या करून डाक्टर व्हावें. इंजिनियर शाळा आहेत त्यांत शिकून सर्वेयर व्हावें. व व्यापार वाढला आहे त्यांत द्रव्य मिळवून प्रसिद्ध व्हावें. कायदेकौंसल आहे त्यांत भाषणें करून प्रसिद्ध व्हावें, तसेंच धारे कमी झाल्यामुळें व महागाईमुळें कुळास मिराशी जाहगिरीप्रमाणें झाल्या आहेत; त्यांत त्यांनीं स्वस्थ असावें. त्यास हें सर्व खरें आहे. यास आह्मी वाईट म्हणत नाहीं, व हीं सर्व ठिकाणें फार योग्य आहेत परंतु त्यांत समावेश व प्रतिष्ठा फार होते असें आह्मांस वाटत नाहीं. याजकरितां मोठी प्रतिष्ठा वाढेल व बहुतांचा गुण दिसून येईल असें साधन कांहीं तरी अवश्य पाहिजे. त्याशिवाय उमेदवाराची तृप्ति होत

नाहीं. लक्षावधी लोक आहेत हे हल्लीं मुकाट्यानें उगीच चोरासारखे बसले आहेत, यांणीं कोठें व कोणत्या कामांत प्रसिद्ध व्हावें ?"

वरील उतारा वाचून कोणास खेद वाटणार नाहीं कीं, प्रस्तुत ग्रंथकारानें शास्त्रें व पुराणें याविषयीं विवेचन करण्याच्या भानगडींत न पडतां आपल्या देशबंधूंस आपल्या बहुश्रुतपणाचा फायदा करून देण्याचें जर मनावर घेतलें असतें तर किती बरें होतें ! तर या गोष्टीविषयीं आमच्या देशबंधूंच्या तर्फेनें नामदार साहेबांस विनंति करून त्यांची रजा घेतों.

---

# आमच्या देशाची स्थिति.

दुर्लभं भारते जन्म मानुष्यं तत्र दुर्लभम् ।*

अंक ७७—(१) विषयोपन्यास. (२) आक्षेपनिरसन–विषयाचे विभाग. (३) आमच्या राज्यकर्त्यांची स्थिति. (४) राजा व प्रजा यांचा संबंध. (५) इंग्रेजी राज्याविषयीं आजपर्यंच्या समजुती. (६) त्यापासून आह्मांस झालेले व होणार फायदे.

१. प्रस्तुत विषय हा वस्तुतः पाहतां अत्यंत व्यापक होय, ह्मणजे त्यांत शेंकडो गोष्टींचा विचार करतां येण्यासारखा आहे, हें उघडच आहे. आमची सांप्रत जी स्थिति आहे तिजविषयीं ऊहापोह करावयाचा ह्मटलें ह्मणजे त्यांत कितीक प्रकार येतात ! प्रथमतः आपली आजपर्यंत काय काय अवस्थांतरें होत गेलीं याचा विचार करणें जरूर आहे; कां कीं सध्यांची स्थिति हें त्या सर्वांचें मिळून एकंदर फळ होय. वरील पूर्व पीठिका झाल्यानंतर हल्लीं आमची काय हालहवाल आहे ती पाहिली पाहिजे. ही स्थिति फार चमत्कारिक आहे हें उघडच आहे; तिला आमच्या पूर्व इतिहासांतच काय पण बहुधा साऱ्या जगाच्या इतिहासांत ही तोड सांपडणें बहुधा कठीण पडेल ! हा दुसरा भाग झाल्यानंतर तिसरा व शेवटचा भाग आमची भावी स्थिति होय. हिजविषयीं अनेकांचे अनेक तर्क आहेत. हे कितपत खरे होतील हें एका परमेश्वरावांचून इतरास अगम्यच होय !

प्रस्तुत विषयाचा वर सांगितला येवढा वस्तुतः पाहतां जरी विस्तार आहे, तरी त्यांतला विशेष उपयुक्त व निश्चित असा भाग ह्मटला ह्मणजे मधलाच होय हें उघड आहे. कां कीं, या देशाची पुढें काय स्थिति होणार याविषयींचे तर्क तर कितीसे निश्चयात्मक होणार आहेत हें कोणीही

---

* "या भरतखंडांत जन्म पावणें हें अगोदर दुर्लभ, आणि त्यांतून मानुष्य दुर्लभ !"

सांगेल, व असल्या शुष्क तर्कांपासून उपयोग कितीसा होणार आहे हेंही दिसलेंच आहे. बरें, मागील कालाविषयीं पाहिलें तर आमचा इतिहास ग्रीक व रोमन लोकांच्या इतिहासाप्रमाणें साद्यंत तर मिळत नाहींच; पण जी कांहीं इकडची तिकडची माहिती माराकूट करून मिळते ती ही पराकाष्टेची संदिग्ध व तुटक मिळते. भूमि खणतां खणतां एकादा भौमासुराचा वाडा लागला तर त्यावरील लेख एके हातांत घ्यावा, व दुसऱ्या हातांत एकाद्या रोमन इतिहासकाराचें वाक्य घ्यावें; किंवा 'विष्णु पुराणां'तला एकादा श्लोक घ्यावा, आणि अमुक अमुक ग्रीक इतिहासकाराचा अमुक अमुक लेख आहे म्हणून त्यांशीं तो ताडून पाहवा; याप्रमाणें 'शेख मिऱ्याचा डोला आणि पर्वतीच्या पायऱ्या' अशी कांहीं सांगड लावून देऊन बादरायण संबंध जोडून द्यावा येवढाच काय तो हल्लींच्या स्थितींत मार्ग उरला आहे! असें करतांना 'मृच्छकटिक' नाटकांतला 'भावश्चेटः चेटो भावः'* हा प्रकार किती वेळां घडत असेल कोण जाणे! तेव्हां भूत, भविष्य व वर्तमान या तिहींपैकीं तिसऱ्या विषयींच आपणास निश्चयात्मक विवेचन करतां येणार आहे, व त्यापासूनच विशेष लाभही आहे. यास्तव तोच घेऊन त्यावर आमचे काय काय विचार आहेत ते वाचकांस सादर करितों.

२. हे विचार या वेळेस सादर करण्याचें एक मोठें कारण असें आहे कीं, आजपर्यंत या विषयाच्या संबंधानें आमचे जे जे विचार प्रगट होत गेले त्यांवरून कित्येकांस एक मोठी शंका उत्पन्न झाली आहे कीं, आमचीं स्वतःचीं मतें तरी काय आहेत? आह्मी कधीं कधीं नव्या लोकांस नांवें ठेवतों; व कधीं कधीं जुन्यांसही ठेवायाला चुकत नाहीं. कधीं इंग्रेजांची व इंग्रेजी ग्रंथकारांची आह्मीं तारीफ केलेली आढळते; कधीं तोच उलटही प्रकार आढळतो. तेव्हां हें आहे तरी काय? एक आमचें कोणत्याच विषयावर कांहींच मत निश्चित म्हणून नाहीं असें तरी असलें पाहिजे; किंवा उगीच हें कांहीं तरी गौडबंगाल तरी आह्मी चालवीत असूं! 'इसापनीती'तील वनदेवास वाटसराची परस्परविरोधी कृति पाहून जसा आचंबा वाटला, व हा लबाड आहे असा त्यानें सिद्धांत करून टाकला; किंवा ग्रहांच्या विचित्र गति, ह्मणजे त्यांचें प्रचलन, स्तंभन व वक्रीभवन,‡ हे प्रकार पाहून प्राचीन

* 'मृच्छकटिकाच्या'च्या प्रथम प्रवेशांत शकार, विट, व चेट हे अंधारांत वसंतसेनेस शोधीत असतां वरील चुकभुली झाल्या आहेत. प्रथम अंक पाहावा.

‡ जो एकाद्या ग्रहाच्या गतीकडे लक्षपूर्वक अवलोकन करील त्यास पुढील विलक्षण प्रकार दृष्टिगोचर होणारे आहेतः—कधीं कधीं त्यांची गति सारखी पुढें

(पुढें चालू.)

ज्योतिषी जसे गोंधळून जात; त्याप्रमाणेंच आमचें मतवैचित्र्य पाहून अनेक वाचक बुचकळ्यांत पडले आहेत असें आह्मांस समजलें आहे. त्याप्रमाणेंच इतर आक्षेपकांचें असेंही ह्मणणें आमच्या कानावर आलेलें आहे कीं, आह्मी हें बरोबर नाहीं, तें बरोबर नाहीं, याप्रमाणें दोषाविष्करण मात्र करतों; पण बरोबर कोणतें, व करावें काय, याविषयीं कोठेंच कांहीं सांगत नाहीं. केवळ निषेध करून काय फळ आहे! निषेध करील त्यानें विधीचाही मार्ग सांगणें अवश्य होय!

आतां प्रथमतः वरील दोन आक्षेपांचा थोडासा विचार करणें जरूर आहे. पहिला आक्षेप हा कीं, आमचें स्वतःचें मत काय आहे तें निश्चितपणें समजत नाहीं. वस्तुतः पाहतां आजपर्यंत जे जे विषय आह्मीं हातीं घेतले त्यांजवर इतरांचे जसे अभिप्राय प्रगट केले त्याप्रमाणेंच आह्मीं आपलेही प्रगट केले आहेत; मग त्यांत संदिग्धपणा कोणता राहिला आहे हें आह्मांस कांहीं समजत नाहीं! आतां आमचें प्रतिपादन कधीं या पक्षाचें असतें व कधीं त्या पक्षाचें असतें हें खरें आहे; पण याचें कारण आमचें बुद्धिचांचल्य नव्हे, तर सत्याचेंच चांचल्य होय. सत्य हें एकाच राष्ट्राला, एकाच धर्माला, किंवा एकाच पक्षाला अनुसरून असतें असें नाहीं; तर अशोधित धातूंत जसे सुवर्णरज यदृच्छेनें मिसळलेले असतात, व रसायनव्यापारांनीं त्यांचें पृथक्करण करून ते वेगळे काढावे लागतात, त्याप्रमाणेंच सत्याचीही गोष्ट होय. त्याचे अंश ज्यांत मिश्रित झाले नाहींत असा प्रायः कोणताही पक्ष नाहीं. यास्तव एकाच पक्षाचा दृढ अभिमान धरणें हा दुरभिमान होय. तर लोकांत यथार्थ ज्ञानाचा प्रसार करण्याचें काम जो पतकरील त्यानें केवळ एका सत्याचीच ओळख ठेवली पाहिजे. अमुक अमुक पक्षाचे किंवा अमुक अमुक मताचे आह्मी अभिमानी आहों असा बाणा 'बांबे ग्याझिट्' किंवा 'ज्ञानोदय' यांच्याप्रमाणें त्याणें बाळगणें ह्मणजे आपलें कर्तव्य विसरून जाणें होय. तर हें तत्त्व नीट लक्षांत ठेवलें असतां आमच्या लेखांत जे कोणास विरोध भासत असतील त्यांचा तेव्हांच परिहार होणार आहे!

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

चालली असते. केव्हां केव्हां तो जागच्या जागीं अडून राहिल्यासारखा दिसतो, व दुसऱ्या वेळीं पहावें तों त्वरा मागें मुरडून पिच्छेहाटही करतो! या शेवटल्या दोन प्रकारांस अनुक्रमेंकरून स्तंभन व वक्रीभवन अशा ज्योतिषांतील संज्ञा आहेत. हे सर्व विचित्र आभास पृथ्वीच्या समकालिक गतीमुळें होतात हें आमच्या वाचकांनीं कांहीं मंडळांस तरी माहीत असेलच.

दुसरा मुद्दा असा कीं, एकाद्या गोष्टीला जो कोणी नांवें ठेवील त्यानें ती सुधारावी कशी हेंही पण जरूर सांगितलें पाहिजे; नाहीं तर नांव ठेवण्यास त्यास अकत्यार नाहीं. हा मुद्दा किती पोकळ आहे हें बहुधा कोणालाही कळणार आहे. अमका मनुष्य नकटा आहे असें कोणी ह्मटल्याबरोबर त्याचें नाक 'चांपेकळी' सारखें करून देण्याचा बोजा लागलींच त्याच्या डोक्यावर येऊन आदळतो काय ? वैद्यानें आपली नाडी पाहून अमुक अमुक विकृति आपल्याला जडली आहे असें सांगितल्याबरोबर आथेल्लोनें जशी यागोची गचांडी धरली त्याप्रमाणें वैद्यराजांवर प्रयोग केला असतां चालेल काय ? 'इंग्रेजी राज्य जुलमी आहे' हे शब्द तोंडावाटे काढावयाचे, तर अगोदर पार्लमेंट, स्टेट सेक्रेटरी, वैसरॉय, गव्हर्नर, कलेक्टर या साऱ्या परंपरेची जेव्हां मनांतल्या मनांत वाट लावून उत्कृष्ट राज्यपद्धतीचा नकाशा अगोदर तंतोतंत जुळवून ठेवावा, तेव्हां तोंड उघडावें, दरम्यान चालला आहे तसा बुक्क्यांचा मार निमूटपणें सोसला पाहिजे, हें ह्मणणें रास्त होईल काय ? वरच्यासारखें तर्कशास्त्र लढूं लागलें तर मोठा जुलूम होणार आहे ! 'अरे, ही भिंत येथें वांकडी आली ना !' असें यजमानानें विचारल्याबरोबर गवंड्यानें हातची करणी खालीं ठेवून द्यावी आणि 'कशी घालावयाची ती अगोदर दाखवा आणि मग बोला' असें खाडदिशीं उत्तर द्यावें, असा न्याय झाला ! तसेंच स्वतः सूपशास्त्रांत अगोदर निपुण व्हावें, आणि मग हें आंबट, तें तिखट, ही चवढव करायाला लागावें; दरम्यान किती आंबट लागलें तरी तोंड वेडेंवांकडें करण्याचा कोणाला अधिकार नाहीं, किंवा तिखटाची आग कानशिलाला जरी जाऊन झोंबली तरी खबरदार कोणी हूं कां चूं केलें तर ! !—तेव्हां एकंदरींत हाही कोटिक्रम अगदीं शुष्क आहे. अमुक अमुक गोष्ट गैर आहे असें सांगण्याचा सर्वांस अधिकार आहे, व ती सुधारण्याचा उपाय सांगण्याची जबाबदारी वरील दूषकावर नियमानें येतेच असें कांहीं नाहीं. दूषकानें दोषाचें आविष्करण करतांना त्याच्या प्रतिक्रियेचाही उपाय सांगितल्यास चांगलेंच. तसें केलें असतां त्यास तें विशेष श्रेयस्कर होणार आहे हें उघडच आहे. पण या वरच्या पायरीपर्यंत जरी त्याची मजल न पोंचली, तरी लोकांचा भ्रम दवडून त्यांस सावध केल्याचें तरी श्रेय त्याजकडे येणार आहे हें उघड आहे. रोगापासून मुक्त करण्याचें सामर्थ्य थोड्यांसच असतें, ह्मणून आपल्या दृष्टीस जी विकृतीची भावना येईल ती कोणाच्या किंवा त्याच्या रूेसांच्या लक्षांत आणून दिल्यानें दौर्जन्य प्रकट होतें असें नाहीं. वरील भावना लक्षांत येणें हेंच पुढील चिकित्सेचें पहिलें अंग होय !

तर याप्रमाणें वरील दोन आक्षेपांचें निरसन झालें. आतां सदरील विषयावर आम्हीं आपले अभिप्राय यापूर्वी प्रगट कां केले नाहींत हा विचार जर कोणाचे मनांत येईल, तर असें करण्याचें कारण उघडच आहे. तें हें कीं, प्रस्तुत विषय हा मोठा खोल आहे. ज्यानें उठावें त्यानें त्यावर वाक्पांडित्य चालवावें किंवा लेखणीची फर्डेशाई उडवावी अशांतला तो नव्हे. त्यास पुष्कळ वाचन, पुष्कळ विचार, पुष्कळ अनुभव व मोठी पोक्त बुद्धि, हीं पाहिजेत. केवळ चार दिवस येथें बडेजावी भोगून गेलेल्या पाश्चात्त्य ग्रंथकारांनीं, किंवा चवाठ्यावर शेणमार खाल्लेल्या खिस्तपुत्रांनीं, आपलें अगाध ज्ञान मिरविण्याच्या उद्देशानें केलेल्या एकदेशीय वर्णनावरून येवढ्या प्रचंड व प्राचीन राष्ट्राची खरी अंतर्गत स्थिति समजणें हें केवळ अशक्य होय. कोणत्याही राष्ट्राच्या स्थितीचें वास्तविक स्वरूप ज्यास माहीत करून घेणें असेल, त्यास तें परवांच्या युवराजांप्रमाणें दीपोत्साहांत हिंडून बड्या दरबारांतील गुळचेट नाटकी बोलण्यावरून समजत असतें असें नाहीं; किंवा साहेबी बंगल्यांतून दुर्भिणी रोखल्यानें ही वरील उद्देश सफळ होत नाहीं. वरील ज्ञानाची ज्यास खरोखरच अपेक्षा असेल त्यानें अंग मोडून जातीनें मेहनत केल्याखेरीज तें कधीं प्राप्त होणारें नाहीं. आपली बडेजावी एकीकडे गुंडाळून ठेवून जो लहानथोरांत सामील होईल, राजापासून रंकापर्यंत परिचय ठेवील, देशभाषांतील ग्रंथांचें सामग्र्यानें अवलोकन करील, चोहोंकडे पर्यटन करून साऱ्या प्रकारची माहिती मिळवील, त्यासच वरील हेतु साध्य होणार आहे. तेव्हां हें सर्व लक्षांत आणलें असतां, आजपर्यंत सदरील विषयावर आम्हीं आपली लेखणी कां चालवली नाहीं, व सध्यांही चालवण्याची आम्हांस धास्तीच वाटते, या दोन्ही गोष्टींची उपपत्ति कोणासही करतां येणार आहे.

येवढी प्रस्तावना करून आतां आम्ही पुढें सरसावतों. वर नुकतेंच सांगण्यांत आलें आहे कीं, प्रस्तुत विषय हा मोठा गहन आहे, याचें यथार्थ विवेचन करावयाचें म्हणजे पुष्कळ साधनें अनुकूल पाहिजेत. हीं आमच्यापाशीं हल्लींच्या स्थितीस जशीं असावींत तशीं जरी नाहींत, तरी प्रकृत महत्त्वाच्या विषयावर दिग्दर्शनमात्रें करून तरी निरूपण करूं अशी आम्हांस उमेद आहे.

असो; आतां या अवाढव्य विषयाचें निरूपण आम्ही कोणत्या पद्धतीनें करणार तें सांगून नंतर विषयास लागूं. आमच्या देशाच्या स्थितीविषयीं जो विवेचन करील त्यानें पुढील तीन विभागांवर आपलीं मनें प्रदर्शित केलीं असतां बस होईल असें वाटतें. हे तीन विभाग येणेंप्रमा-

णेंः—( १ ) आमच्या राज्यकर्त्यांची स्थिति ( २ ) एतद्देशीय राजेरजवाड्यांची स्थिति ( ३ ) सामान्य लोकांची स्थिति. तर आतां पहिला विभाग उचलून त्याच्या संबंधानें आमचे आज मित्तीला काय काय अभिप्राय झाले आहेत ते निवेदन करतों.

वरील तीन भागांपैकीं या प्रथम विभागावर आपले काय विचार असतील ते बेधडक कागदावर नमूद करणें हें हल्लींच्या बादशाही कारकीर्दींत मोठें कठीण काम झालें आहे हे सर्वांस महशूर आहेच. त्यांतून दिल्लीपदावर आरूढ झाल्यानंतर लवकरच आमच्या राज्यकर्त्यांनीं छापखान्यावर केवढी कदर चालू केली, व सार्‍यांचीं मुसकटें कशीं आंवळून टाकलीं, हेंही सर्व प्रसिद्धच आहे. आतां विलायतेंत त्यावर जी झटापट झाली, व बीकन्सफील्ड महाराजांच्या जागीं ग्लाडस्टन् साहेबांचें प्रभुत्व स्थापित झालें. त्याच्या योगानें वरील खग्रास बराच सुटला आहे हें खरें; तरी पूर्ण मोक्ष होऊन कैलासवासी लार्ड साहेबांच्या नांवें बुचकळी मारण्याची मोकळीक सर्वांस होईपर्यंत चकोर मंडळीस स्वच्छंदेंकरून भरार्‍या मारण्याचें अवसान येणार नाहीं हें उघड आहे. यास्तव इंग्रेजी पेन हातीं धरलें असतां प्रस्तुत विषयाचें विवेचन जसें आम्ही करूं, किंवा एकादा फ्रेंच, रशियन, अगर अमेरिकन ग्रंथकार जसें त्यावर निष्प्रतिबंध लिहील तसें प्रस्तुत प्रसंगीं आमच्या हातून होणार नाहीं हें खरें; तथापि पुढें ज्या गोष्टी आम्ही दाखल करणार त्या सर्व इतिहासप्रसिद्ध व लोकप्रसिद्ध असल्यामुळें त्यांच्या संबंधानें यथास्थितपणें विवेचन करण्यास आम्हांस कोणतीही हरकत नाहीं.

आतां आमचे धर्मनिष्ठ बंधु 'ज्ञानोदय 'व राजनिष्ठ बंधु 'एलिफास्' अशा मंडळीस आमचें पुढील विवेचन कोणत्या तर्‍हेनें भासेल, व त्यांतील कोटिक्रम त्यांच्या पवित्र व ज्ञानमय चित्तावर कोणत्या प्रकारें आरूढ होईल, हें आह्मी पुरतेपणीं जाणून आहों; पण आमच्या हल्लींच्या स्थितींत त्यांच्या अभिप्रायांची आम्हांस मोठीशी फिकीर करायाला पाहिजे असें नाहीं. शिवाय त्यांची वादपद्धति किती मुद्देशीरपणाची असते हें यापूर्वी अनेक प्रसंगीं आमच्या वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. यास्तव पुढील विवेचनाच्या संबंधानें निघणारे जे त्यांचे नेहमींचे आक्षेप, कीं आपल्या राज्यकर्त्यांस अप्रिय होईल असा मजकूर लिहिणें हें मोठें अनुचित कर्म होय, व ज्यांनीं आपणांस ज्ञान दिलें त्यांचे दोष काढूं पाहणें हा मोठा अधमपणा आहे, इ० इ०, या सर्वांकडे आह्मी कानाडोळा करून आपल्या मार्गास लागतों.

३. 'आमच्या राज्यकर्त्यांची स्थिति ' या प्रकरणांत आह्मी पुढील

गोष्टींविषयीं निरूपण करणार. प्रथमतः आमचा व आमच्या राज्यकर्त्यांचा संबंध कसा जडला, आमची पूर्वींची स्थिति कशी होती, हल्लीं कशी आहे, सरकारचें आमच्याशीं कोणत्या तऱ्हेचें वर्तन आहे, तें असायाला कसें पाहिजे, इत्यादि.

इसवी सनाचें सोळावें शतक संपे तोंपर्यंत आह्मी इंग्रेजांचे कोणी नव्हत व इंग्रेज आमचे कोणी नव्हत ही स्थिति होती, हें सर्वांस माहीत आहेच. शत्रु मित्र व उदासीन या संबंधत्रयापैकीं आमचा व आमच्या प्रस्तुतच्या राज्यकर्त्यांचा त्या वेळेस शेवटला काच तो संबंध होता. पुढें या देशाची कीर्ति ऐकून पोर्च्युगीज, डच, फ्रेंच, डेन्स वगैरे लोकांप्रमाणें इंग्रेज हेही आमच्या देशांत येऊन येथें वखार घाल, तेथें थोडीशी जमीन खरेदी कर, याप्रमाणें त्यांनीं क्रम आरंभला. सारांश, पारशी लोक जसे स्वदेशास पारखे होऊन गुजराथच्या राजाला शरण येऊन त्याच्या मुलखांत वणिग्वृत्तीनें राहिले, * किंवा मारवाडी जसे लोटा व रस्सी येवढें भांडवल घेऊन प्रथमतः येतात व ' कांच बांगडी फुटाणो' करून वाणिज्यवृत्तीस आरंभ करतात, त्याप्रमाणेंच आमच्या सांप्रतच्या राज्यकर्त्यांची मूळ पीठिका आहे. † पुढें एका इंग्रेजी डाक्तरानें दिल्लीच्या बादशाहास

---

* पार्शी लोकांचा मूळ देश हल्लीं ज्यास इराण ह्मणतात तो होय. त्यावर मुसलमानांनीं स्वारी करून तो इ० स० ६५० या वर्षी काबीज केला. तेव्हां कांहीं लोक आपला फार दिवसांचा अग्नि व धर्मपुस्तकें हीं जवळ करून गलबतांत बसून निघाले, ते गुजराथेच्या किनाऱ्यावर येऊन दाखल झाले. तेव्हां त्या देशाच्या राजानें त्यांजपासून कांहीं आणभाक करून घेऊन त्यांस आपल्या मुलखांत राहण्याची परवानगी दिली पारशांची अग्यारी, वहाणर पदरी लोकरीचें जानवें, विटाळशीचा विटाळ, गोमांसवर्जन, वगैरे गोष्टी प्रसिद्धच आहेत. पुढें मुसलमानी अंमल झाल्यावर वरील लोकांस डुकराचें मांसही सोडून खावें लागलें. या लोकांनीं आपली वाणिज्यवृत्ति अद्याप कायम ठेवली असून ते आजपर्यंत कोणत्याही उलाढालींत पडले नाहींत. व आपल्या आश्रयदात्यांशीं त्यांनीं निमकहरामीपणा केला नाहीं. ही गोष्ट त्यांस भूषणास्पद समजली पाहिजे! नाहीं ह्मणायाला आमच्या पुण्याचे मोदीसाहेब मात्र शेवटल्या राजर्षीच्या कारभारांत थोडेसे पडले होते. पण त्यांस लवकरच हिरकणीचें प्रायश्चित्त घेणें भाग पडलें.

† प्रसिद्ध अमेरिकन कवि मॉंटगामेरी [मेकालेच्या तावडींत सांपडलेले रेवरंड बोवा नव्हेत!] यानें एका काव्यांत पुढील विलक्षण उल्लेख केला आहे:—

" Either India next is seen,
With the Ganges stretched between,

(पुढें चालू.)

वरा केला, नानासाहेब पेशव्यानें इंग्रेजांची मदत घेऊन आंग्र्याचा मोड केला, आरकाटच्या नबाबास त्यांनीं साह्य केलें, अशा लहानमोठ्या कामगिऱ्यांवर या लोकांनीं एतद्देशीय राजांपासून जकातीची माफी घेतली, * गांव इनाम घेतले, असा प्रकार चालू झाला. पुढें हे जरासे जोरावर आल्यावर यांच्या व फ्रेंच लोकांच्या लढाया सुरू झाल्या. यांत सुदैवेंकरून आमच्या भावी राज्यकर्त्यांसच जय येत गेला. फ्रेंच लोकांनीं शेवटपर्यंत इंग्रेजांचा पाडाव करण्याचा प्रयत्न

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

Ah! What horrors here have been!
"War disguised as commerce came,
Britain, carrying sword and flame,
Won an empire, lost her name?"

*Voyage round the world.*

वरील उल्लेखाचा एक भाग या अमेरिकन कवीनें बहुधा द्वेषबुद्धीनें लिहिला असावा, त्याजबद्दल त्याच्यापाशीं काय पुरावा असेल नकळे! पण दुसरा भाग मात्र सर्वथा यथार्थ होय. त्याबद्दल खुद्द राज्यस्थापकाच्या हातचेंच सर्टिफिकिट घ्या:—

"Alas!" says Clive, "how low is the English name sunk! I could not avoid paying the tribute of a few tears to the departed and lost fame of England and the British nation-recoverably so, I fear. However, I do not declare, by that great Being who is the searcher of all hearts, and to whom we must be accountable if there be a hereafter, that I am come out with a mind superior to all corruption, and that I am determined to destory these great and growing evils, or perish in the attempt."

*Essay on Lord Clive.*

* हामिल्टन् नांवाच्या एका इंग्रेजी वैद्यानें फिरुक्शीर बादशाहास रोगमुक्त केलें; याबद्दल बादशाहाकडून इंग्लिशांस मद्रासेजवळ तीन गांवें मिळालीं, व कलकत्त्याजवळ सदतीस गांवें खरेदी करण्याची परवानगी मिळाली. खेरीज वर सांगितलेली जकातीची माफी! या एका गोष्टीवरून आम्हांत व इंग्रेजांत काय फरक आहे तो तेव्हांच लक्षांत येण्यासारखा आहे. हामिल्टन्च्या जागीं आमच्या इकडचा कोणी मनुष्य असता, म्हणजे तो आपल्यापुरता विचार करून आपणास एखादी जहागीर वंशपरंपरा करून घेता आणि आमचे धुलीपासिंग महाराज; जसे खुशाल विलायतेस रमून राहिले आहेत त्याप्रमाणेंच तो इकडे दिल्लीपतीच्या चरणारविंदीं निरंतर पडून राहता!

चालवला होता.* व एके प्रसंगीं डच लोकांनींही आपलें घोट शिरकविण्याचा लाग केला होता,† पण इंग्रेजांची सद्दी जबर ! त्यांच्या आणीबाणीच्या प्रसंगीं क्लैव्ह, कूट, वेलेस्ली, हावलॉक् यांच्यासारखे जाडे सरदार सेनानायक होऊन त्यांचा मागें पाय म्हणून फार करून कोठें आलाच नाहीं ! आतां हें खरें, कीं त्यांनीं माधवराव, महादजी, रणजितसिंग अशा प्रबळ पुरुषांशीं स्नेहभावच राखून त्यांच्या मरणानंतर त्यांच्या कारभारांत ढवळाढवळ केली, व दोन्ही पक्षांकडील सेनानायक एका तोडीचे आहेत असा फार करून योग आलाच नाहीं; तरी एकंदरींत पाहतां या पाश्चात्त्य लोकांची सद्दी, त्यांचें कारस्थान, व कवायत हीं विशेष खरीं. त्यांच्या योगानें हिंदुस्थानासारखें अफाट राज्य त्यांच्या अचानक पदरीं पडलें. एरवीं मूळारंभीं पाहतां एक लहानशी व्यापाऱ्यांची मंडळी ती काय निघाली, हिनें दीडशें वर्षेपर्यंत या देशांत नुसती वाणिज्यवृत्ति ती काय केली, पुढें एकाएकीं तराजूची दांडी टाकून देऊन ते वैश्याचे क्षत्रिय काय बनले, व हळू हळू पाय सरकवतां सरकवतां सान्या राजेरजवाड्यांस घेताघेतानें गुंडाळून टाकून सेव्यसेवकभावाचा विपर्यय करून सार्वभौमपदावर आरूढ ते काय झाले ! एकंदरींत साराच गौडबंगाली खेळ ! तेव्हां इंग्रेज ग्रंथकारांच्या व विशेषतः मिशनरींच्या तोंडून जो कधीं कधीं धन्यवाद निघतो कीं हें भरतखंड आकाशांतील बापानें आमच्याकडे मेहेरबानीनें सोंपवून दिलें आहे, त्याची यथार्थता कोणास भासणार नाहीं !

तर याप्रमाणें कोणीकडे इंग्लंड व कोणीकडे हिंदुस्थान, पण प्रभूच्या अचिंत्य करणीनें या दोहों देशांची आज कितीक वर्षांपासून सांगड जु-

---

* वरील प्रयत्नांपैकीं सान्यांत जबरा प्रयत्न म्हणला म्हणजे नेपोलियनाचा. त्यानें ईजिप्ट ( मिसर ) देशांतून टिप्पु सुलतानाशीं संधान चालविलें होतें. सन १७९९ च्या जानेवारी महिन्यांत त्यानें टिप्पूस असें पत्र लिहिलें होतें कीं, " इंग्लिश लोकांच्या जाचांतून आपणांस सोडविण्यास मी आपली अजिंक्य फौज घेऊन निघालों आहें ! " पण ही फौज पुढें जों येणार तों अगोदरच इंग्लिश लोकांनीं श्रीरंगपट्टणावर गर्दी करून सुलतान साहेबांस अक्षय्य पदीं आरूढ केलें ! वरील राजश्रींनीं शेवटीं शेवटीं फ्रेंच प्रजासत्ताक राज्याचीही दीक्षा धारण करून 'सिटिजन् टिप्पू' ही किताबत सुरू केली होती !!

† हा प्रसंग मीरजाफर यानें त्यांच्याशीं गुप्तपणें संधान बांधून इंग्रेजांस घालवून देण्याची जी मसलत योजली होती तो होय. यास कितपत यश आलें हें सांगावयाला नकोच. हल्लीं सुरत मुक्कामीं एक शेत काय तें डच लोकांकडे राहिलेलें आहे !

ळून गेली आहे ! आतां ही जी इंग्रेज लोकांची या अफाट देशावर सत्ता चालू झाली आहे ही कोणत्याही तऱ्हेनें मिळविलेली असो, तिजविषयीं तूर्त आह्मांस विचार कर्तव्य नाहीं. आह्मी असेंच घेऊन चालतों, कीं प्लासीच्या लढाईपासून तों राणीसाहेबांच्या जाहीरनाम्यापर्यंत जो जो आमच्या सरकारानें येथें कारभार केला तो सर्व अगदीं न्यायाचा होता. कंपनी सरकारचे पहिले गवर्नर जनरल वॉरन् हेस्टिंग्स् यांच्यापासून तों शेवटले लार्ड डालहौसी यांच्या पावेतों सर्वांनीं जो जो व्यवहार केला तो तो रास्त, जीं जीं युद्धें केलीं तीं तीं धर्मयुद्धें, हें सर्व आह्मांस कबूल आहे. आतां हें सर्व गृहीत धरून सध्यां आमची स्थिति कशी आहे व आमचे राज्यकर्ते आह्मांस कोणत्या तऱ्हेनें वागवीत आहेत हें पाहूं.

१४. राजा व प्रजा या दोघांचा परस्पर संबंध कोणत्या तऱ्हेचा असावा-ला पाहिजे हें बहुधा कोणालाहि सांगायाला नकोच. 'प्रजा' शब्दाचा मूळ अर्थ 'संतति' असा आहे; तेव्हां या अर्थाप्रमाणें पाहतां बापाचा व मुलांचा संबंध तोच वस्तुतः पाहतां राज्यकर्त्यांचा आणि राष्ट्राचा असायास पाहिजे. ह्मणजे बाप जसा मुलांचें लालनपालन करतो, त्यांस सन्मार्गास लावून सुशिक्षा देतो, व त्यांचें जें हित व थोरपणा तेंच त्याचें हित व त्याचाही थोरपणा- अशी त्याची समजूत असते. तशीच समजूत राजानें आपल्या प्रजेविषयीं बाळगिली पाहिजे. आजपर्यंत जे महाविख्यात राजे होऊन गेले त्या सर्वांच्या कारकीर्दींत हाच प्रकार नजरेस येतो. आमच्याच देशाविषयीं विचार केला तर राम, युधिष्ठिर, वगैरे पौराणिक काळांतले राजे जरी सोडून दिले, तरी थोरले माधवराव, अहल्याबाई, अकबर, वगैरेंची राज्यरीति सर्व प्रकारें वरील मनुष्यांचीच दिसून येते. आमच्या प्रस्तुतच्या राज्यकर्त्यांविषयीं जरी पाहिलें तरी त्यांचा पहिल्यापासून हाच थाट आहे. हिंदुस्थानांतले लोक अर्धवट रानटी आहेत त्यांस सुधारायाचें, ते अज्ञान आहेत त्यांस सज्ञान करायाचें, त्यांचा धर्म वाईट आहे तर त्यांस चांगल्या धर्मांत आणून सोडावयाचें, त्यांच्या देशांत चोहोंकडे झोटिंग पाच्छाई होती ती मोडून टाकून त्यांस यथान्याय राज्य करण्याची पद्धति लावून द्यावयाची,— हा एकंदर प्रकार ! राणीच्या जाहीरनाम्यांत, पार्लमेंटांतील भाषणांत, गवर्नरप्रभृति येथील अधिकाऱ्यांच्या बोलण्यांत एकंदर मथितार्थ ह्मटला ह्मणजे हा कीं, या देशावर आधिपत्य करण्याचा आमच्या पाश्चात्य बंधूंचा मतलब ह्मटला ह्मणजे या देशाचें हित हाच केवळ होय. बाकी आमच्या धर्मप्रभूंस येवढ्या अफाट देशाचें राज्य चालवण्यापासून स्वतःला ह्मणजे कांहीं फायदा आहे असें नाहीं. कित्येक पंडित तर

'केसरि हिंद्' शाही हा आंतबट्ट्याचा व्यापार आहे असेंही म्हणायाला चुकत नाहींत ! असो ; धन्य त्यांची; आमचें सर्वस्व जाऊनही जेव्हां आमच्याच पायीं विलायतेस चूड, तेव्हां लांडग्यानें कोंकरावर जो चार्ज ठेवला, कीं तूं माझें पाणी गढूळ करतोस, तो बरोबर म्हटला पाहिजे; व आमच्या भाषेंत जी म्हण आहे, कीं 'मेंढी जाते जिवानिशीं आणि खाणारा म्हणतो वातड' ती ही प्रस्तुत प्रसंगाला लावली पाहिजे !

असो ; वरील मतांच्या यथार्थत्वाविषयीं किंवा अयथार्थत्वाविषयीं आम्हांस विचार कर्तव्य नाहीं. त्यावरून इतकेंच तात्पर्य घ्यावयाचें, कीं आमचे प्रस्तुतचे राज्यकर्ते या देशाच्या संबंधानें कोणत्या बुद्धि मनांत बाळगतात, किंवा निदान बोलण्यांत तरी दाखवतात. आतां आज सरासरी शतकभर जो पाश्चात्यांचा आमच्यावर अंमल चालला त्यायासून आमचें हिताहित काय झालें याविषयीं निःपक्षपात बुद्धीनें विचार करूं,

५. सुमारें वीस पंचवीस वर्षांपूर्वीं वर्तमानपत्रांतून व ग्रंथांतून इंग्रेज लोकांचा केवळ स्तुतिपाठच चालत असे ही गोष्ट सर्वांस माहीत आहेच. 'आमचें शहाणें व दयाळू सरकार,' 'इंग्रेजी राज्य झाल्यापासून या देशास अनेक फायदे झाले' इत्यादि प्रकारांनीं फार करून ग्रंथांचे प्रस्ताव होत असत. अलीकडे पाहावें तों वरील मन्वंतर अगदींच फिरल्यासारखें दिसत आहे. मागें जी आमच्या राज्यकर्त्यांविषयीं लोकांची पूज्यबुद्धि होती व त्यांचे ठायीं जें प्रेम होतें तें हल्लीं पुष्कळच कमी झालें आहे. आम्हांस वरील दोन्हीही गोष्टी कबूल नाहींत. मागलें अज्ञानदशेंतलें प्रेमही आम्हांस पसंत नाहीं, व अलीकडचें दुराग्रहजन्य अप्रेमही आम्हांस मान्य नाहीं. केवळ तिऱ्हाईतपणानें आम्हांस जी गोष्ट खरी वाटते ती आम्ही येथें नमूद करणार. तर आतां इंग्रेजी राज्यापासून आम्हांस फायदे कोणते झाले किंवा होण्यासारखे आहेत याविषयीं प्रथमतः विचार करूं.

६. युरोपांतील लोकांचें अलीकडे विद्येंत पाऊल पुष्कळ पुढें सरकलें असल्यामुळें त्यांची कल्पना अशी झाली आहे कीं, सुधारणा काय ती आमच्या खंडांत. एशियांतले सारे लोक गैरसुधारलेले ! हीच कल्पना इंग्रेज लोकांची एतद्देशीयांविषयीं आहे हें सर्वप्रसिद्धच आहे. आतां हींत वस्तुतः पाहतां जरी थोडाच अर्थ आहे तरी हल्लींच्या स्थितींत आम्हांस युरोपस्थांकडून पुष्कळच नवी माहिती करून घेण्यासारखी आहे हें उघड आहे. वास्तव आपणाहून विद्वान् असणाऱ्या मनुष्याशीं समागम घडला असतां जसा आपणांस नेहमीं फायदा असतो; त्याप्र-

माणेंच सध्यां इंग्लंड व हिंदुस्थान या दोन देशांचा जो निकट संबंध जडला आहे त्यापासून विशेषतः हिंदुस्थानास बहुत लाभ होण्यासारखे आहेत हें कोणासही कबूल करणें भाग आहे. एकाद्या शाहण्या मनुष्याच्या घरचें भांडवल हवालीं केलें असतां तो जसा लवकरच दामदुप्पट करून दाखवतो. व उत्तरोत्तर बहुगुणित अर्थसंचय त्यापासून निष्पन्न करतो, त्याप्रमाणेंच प्राचीन ग्रीक, रोमन, हिंदु, आरब वगैरे लोकांपासून पाश्चात्यांनीं जें ज्ञान संपादन केलें तें त्यांनीं आपल्या उद्योगानें आलीकडे पुष्कळच वाढवलें आहे यांत संशय नाहीं. पूर्वीं जीं अनेक शास्त्रें होतीं तीं त्यांनीं नवीन शोध सामील करून पुष्कळ वाढविलीं आहेत, व दुसरीं तर पूर्वीं अज्ञात असलेलीं नवीं काढून त्यांचा बहुत विस्तार केला आहे. तेव्हां हल्लीं हें अपरंपार भांडवल आयतेंच आमच्या स्वाधीन होणारें आहे; मग हा काय लहानसहान लाभ ह्मणावा! त्यांतून, कोणत्याही उद्देशानें ह्मणा, हें सर्व अपूर्व भांडार आमच्या राज्यकर्त्यांनीं बळेंबळें आमच्या गळ्यांत बांधण्याचा हा आज वीस पंचवीस वर्षें अव्याहत उद्योग चालवला आहे, व त्यास यशही पुष्कळ आलें आहे. तेव्हां आमचा व इंग्रेजांचा समागम झाल्यापासून हें एक मोठें फल आह्मांस प्राप्त झालें आहे.

दुसरी गोष्ट व्यावहारिक कलांचें ज्ञान. या कला आलीकडे साऱ्या युरोपांत व अमेरिकेंत किती वाढल्या आहेत व त्यांच्यापासून मानवजातीचें किती कल्याण झालें आहे व होण्यासारखें आहे हें आजच्या मित्तीला कोणालाही सांगण्याची जरूर उरली आहे असें नाहीं. छापखाना, आगगाडी, आगबोट, तारायंत्र, प्रकाशालेख्य, गिरणी, वगैरे गोष्टींकडे जो क्षणभर लक्ष पुरवील त्यास 'सहाव्या पुस्तकां' तील 'तीन राक्षसां' च्या धड्याची आठवण झाल्याशिवाय रहाणार नाहीं. केवढ्या अद्भुत या शक्ति! 'महाभारतां'त वेषधारी नलराजाच्या सारथ्यकर्माचें वर्णन केलेलें आहे कीं ऋतुपर्ण राजाचा शेला रथवेगाच्या सपाट्यांत उडून खालीं पडला, तेव्हां बाहुकानें त्यास सांगितलें कीं, 'तो राहूं द्या आतां, एक योजनभर तो मागें राहिला आहे'!* वरील इतिहासांतच अर्जुनाच्या हस्तलाघवाचें वर्णन केलें आहे कीं, त्यानें एका बाणाच्या

* "त्या नृपवार्ष्णेयांचे दाटाति पाहोनियां जवास गळे।
तों स्यंदनावरुनि भूपृष्टीं साकेत-राज-वासगळे॥
"भूप म्हणे पडला गा भू-पृष्ठीं उत्तरीय-पट थांब।
बाहुक म्हणे पडों या तो योजन एक राहिला लांब॥
'वनपर्व'—२०

टोंकाला पत्र लावून तें आपल्या बापाच्या कचेरींत धाडून दिलें. त्याप्रमाणेंच कर्णानें पृथ्वी उचलिली, मारुतीनें सूर्यबिंबाच्या ग्रासार्थ उड्डान केलें, दुर्वासऋषीनें एकदम अठ्यायशीं सहस्र ऋषींचा तांडा आणून पांडवाच्या आश्रमाशीं 'अल्लक' म्हणून गर्जना केली, व येवढा जबरदस्त भोजनसमारंभ काम्यक वनांत घडविला! वरील सर्व अचाट गोष्टी आज एकोणिसाव्या शतकांत प्रत्यक्ष घडूं लागल्या आहेत ही केवढी अजब बात आहे! आमच्या गुर्जरदेशाधिपतींस जेव्हां परवां अग्निरथांत घालून चाळीस तासांत पूर्वसमुद्रतीरचें मद्रपुर दाखविलें, तेव्हां त्यांस ऋतुपर्णाचा हेवा करण्यास थोडेंच कारण राहिलें असेल! मोठमोठ्या राजेरजवाड्यांच्या डोक्यांवरून सफाई हात फिरवून लॉर्ड डालहौसी साहेब जेव्हां थकले भागले होत्साते हरि हरि म्हणायाला परत निजधामास गेले, व लंडनांतल्या तारागृहांतून त्यांनीं हिंदुस्थानाची आलबेली विचारली * तेव्हां अर्जुनाच्याच कृतीचा नमुना उतरला नाहीं काय? वरील भारती वीराच्या प्रतिपक्ष्यानें 'सप्तद्वीपा पृथ्वी' मोठ्या प्रयासानें सारी चार अंगुळें उचलिली, आज एकोणिसाव्या शतकांत तर तिला तागडींत घालून तिचें वजनही काढून मंडळी मोकळी झाली आहे! अंतरालांत लाखों कोस उड्डाण एका क्षणांत करण्याचें अद्भुत साधन आज मानवजातीस उपलब्ध झालें आहे हें कोणास माहीत नाहीं? त्याप्रमाणेंच वरच्यासारखा दाढीवाल्यांचा कंपू जर एकदम येऊन उतरला, तर तितक्यांची अन्नसामग्री एका सपाट्यास तयार करण्याची तजवीज या अद्भुत शतकांतल्या एकाद्या सार्वजनिक महानसांत सहज होण्यासारखी आहे. बोळवणी करतांना प्रत्येक ऋषिजनास वस्त्रदान करायाचें मनांत आणल्यास तेंही तसेंच सुकर आहे! सारांश रावणानें जसे सर्व देव काबीज करून कोणाची पाककर्मावर, कोणाची सम्मार्जनावर, वगैरे नेमणूक करून साऱ्यांस सारखें राबविलें होतें, त्याप्रमाणेंच

* वरील लाटसाहेबांनीं आपली कारकीर्द आगगाडी, तारायंत्र, टपाल, विद्याखातें वगैरे अनेक गोष्टी मोठ्या झपाट्यानें अमलांत आणून चोहोंकडे गाजवून दिली हें इतिहासज्ञांस सांगायास नकोच! त्यांनीं अयोध्येचा शेवटचा गोड घांस माजी कुंपिणी बाईस चारून स्वदेशवास जेव्हां केला, तेव्हां नूतन स्थापित विद्युद्यंत्राच्या द्वारें त्यांनीं तेथून इकडचें क्षेमकुशल पुसलें कीं अयोध्याप्रांतांत सर्व सामसुम आहेना! इकडूनही उत्तर गेलें.—ऑल् वेल् (आलबेल)! वरील आलबेलीच्या पाठोपाठ केवढी गलबल झाली व कुंपिणीबाईस लाटसाहेबांनीं जें बळकट अजीर्ण करविलें त्याच्या योगानें तिची विचाराची पुरीं शंभर वर्षें भरून तिचा अपूर्व अवतार कसा आटपला हें आबालवृद्धांस श्रुत आहेच! अयोध्येंत पाऊल पडल्यावर राम म्हणण्याचा योग येणें हेंही साहजिकच आहे!!

आमच्या प्रस्तुतच्या राजकर्त्यांनीं सर्व महाभूतें वठणीस आणून त्यां- जपासून ते चोपून कामें घेत आहेत!! *

मग अशा अद्भुतप्रभावाच्या राष्ट्राशीं जर आपला आयताच योग जमून आला आहे तर ही केवढी सुदैवाची गोष्ट समजली पाहिजे! रशियाचा पहिला बादशाहा पीटर दि ग्रेट यास आपला देश सुधारावयाचा होता तर हातचें राजवेत्र टाकून व बादशाही पोषाक फेंकून देऊन मजु- राचा धडधाकट डगला व हत्यारांची पेटीही त्यास पतकरावी लागली. मग पाश्चात्यांची अपूर्व विद्या जर आपल्या पायांनीं आमच्या देशास चालून आली आहे तर ही केवढी मोठी सोय आह्मांस झाली आहे बरें!

तिसरा लाभ मानसिक उन्नति. मानसिक उन्नति ह्मणजे देशाभिमान, जात्यभिमान, स्वाभिमान, अनुचित कर्मापासून निवृत्ति, स्वातंत्र्याभिलाष, दैन्यवर्जन, इत्यादिकांविषयीं ज्या मानसिक स्थितीपासून स्फूर्ति होते. ती. ही स्थिति असणें हेंच देशोन्नतीचें प्रधान साधन होय, व तिचा अत्यंताभाव ह्मणजे देशाच्या अपकर्षाची परमावधि होय! आतां हा लाभ इंग्रेजी राज्यापासून होईल हें म्हणणें पुष्कळांस सकृद्दर्शनीं विरुद्धो- क्तीसारखें भासेल; पण मागील इतिहासावरून जो प्रत्यंतर पाहील त्या- च्या ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे, कीं विद्येचा संस्कार हा सामान्यतः वरील उन्नतीस कारणभूत होतोच; आणि त्यांतून ग्रीक, रोमन, इंग्लिश वगैरे विद्यांचा तर वरील प्रभाव स्पष्टच आहे! युरोपखं- ड जें गाढ अज्ञान निद्रेंत शतकांचीं शतकें घोरत पडलें होतें त्यांतून त्याची जागृति कशाच्या योगानें झाली बरें? ग्रीक व रोमन लोकांची प्राचीन विद्या,—दुसरें कांहीं नाहीं. या विद्येचें पुनरुज्जीवन, हल्लीं जसें संस्कृताचें कांहीं होत चाललें आहे, त्याप्रमाणें पंधराव्या शतकांत सुरू झालें. या अमृतवल्लीचा थोडाबहुत रस पोंचतांच मृतप्राय जें युरोपखंड त्याच्यांत एकाएकीं चळवळ उत्पन्न होऊन लवकरच तें खडखडीत जागें झालें. मग काय विचारतां! गलिव्हर जागा होतांच त्यानें छोटेखानी लोकांचे पाश जसे तडातड खाडदिशी तोडून टाकले, आणि मोकळा झाला; त्याप्रमाणेंच वरील खंडाचीही अवस्था झाली. प्राचीन ग्रीक व रोमन ग्रंथकारांचें अध्ययन करतांच त्या राष्ट्रांची वी-

---

* हल्लीं आमच्या प्रभूंनीं पंचमहाभूतें आकळून त्यांजवर जें स्वामित्व चालवि- लें आहे त्यावर मागील पौराणिक वर्णनास अनुसरून किती विचित्र कवित्व करतां येणार आहे? 'रामायणांत' व 'कुमारसंभवांत' त्यांतील प्रतिनायकांच्या वैभवाचें वर्णन आमच्या प्राचीन कविवरांनीं केलेलें आहे. आलीकडील थोडा मा- सला 'पद्यरत्नावली' तील एका प्रकरणांत सांपडेल.

रशी इंग्लिश, फ्रेंच, जर्मन वगैरे लोकांचेठायीं संचरली, आणि अनेक बंधनांतून ते भराभर मोकळे होत गेले. प्रथमतः रोमनगरीं पोप महाराजांनीं कित्येक शतकें बंड माजवून ठेवलें होतें त्याच्यावर हल्ला पडला. वरील धर्मप्रभूचा अंमल अर्ध्या युरोपानें एकदम झुगारून दिला, व जिकडे तिकडे ज्याला जसा वाटला तसा त्यानें निराळाच पंथ काढला! याप्रमाणें आपल्या पारलौकिक पारतंत्र्याचा नाश करून युरोपचीं राष्ट्रें आपल्या ऐहिक प्रभूंवर उलटलीं, आणि राजा ह्मणजे ईश्वरी अंश होय इत्यादि असमंजस कल्पनांचा त्याग करून त्यांनीं आपापले हक्क शाबीत केले. या कृत्यांत आमचे राज्यकर्ते हे तर सर्वांत प्रमुख झाले. त्यांनीं एका राजाशीं युद्ध करून येथल्या प्राचीन वेनराजाप्रमाणें त्यास मारून टाकलें, व त्याचेच चिरंजीव पुनः तेच तेच चार जेव्हां करूं लागले तेव्हां त्यांसही पदच्युत करून तिसऱ्यालाच राजपदावर प्रतिष्ठापित केलें. फ्रान्स देशांतही हा दंगा तीन वेळां होऊन हल्लीं तेथें प्रजासत्ताक राज्यच चालू आहे. याचप्रमाणें जर्मनी, रशिया वगैरे राष्ट्रांतून हीच चळवळ सुरू आहे. अमेरिकेंतल्या लोकांनीं गेल्या शतकांत काय प्रकार केला तो तर जगजाहीरच आहे. असो; तर एकंदरींत हें सांगावयाचें कीं सज्ञान दशेचें फळ देशोन्नति हें होय. यास्तव आमच्या देशांत जों जों इंग्रेजी विद्येचा प्रसार होत जाईल तों तों सुधारणा, स्वातंत्र्य, सुख यांचा प्रसार अवश्य होत जाणार! एक इंग्रेजी विद्येचें वज्र आमच्या हातांत असलें, म्हणजे मग लिटन्‌शाही, टेंपल्‌शाही, चार्टफील्‌ड्शाही, मूरशाही, वगैरे शंभर शाह्यांस सुद्धां आम्ही दाद देणार नाहीं!!

याखेरीज इतर जे अनेक लाभ प्रस्तुत राज्यापासून या देशास झाले आहेत ते सर्वांस मशहूर आहेतच. पूर्वीं ज्या प्रकारची स्वस्थता या देशास बहुधा कधींही प्राप्त झाली नसेल तशा प्रकारची गेल्या पन्नास साठ वर्षेंभर येथें नांदत आहे. इंग्रेजी होण्याच्या पूर्वीं प्रत्यहीं घडणाऱ्या ज्या गोष्टी, ह्मणजे लढाया, मारामाऱ्या, पेंढारी दंगा वगैरे, त्या आतां साऱ्या स्वप्नवत् झाल्या आहेत. पाश्चात्य राज्याच्या विस्तीर्ण छायेखालीं हें अवघें भरतखंड खुशाल झोपेंत घोरत आहे असें ह्मटलें तरी चालेल! आढ्याला पाय लावून बिनधोक निजण्याचा काळ या राष्ट्रास यापूर्वीं असा कधींही लाधला नाहीं! काठीला सोनें बांधून काशीपासून रामेश्वरापर्यंत जावें अशी जी सदरील कारकीर्दीची लोक तारीफ करतात ती अगदीं वाजवी आहे. त्याप्रमाणेंच पूर्वीं या देशाचा व्यापार जो अगदीं संकुचित होता तो आतां साऱ्या जगभर होण्याऱ्याही उत्कृष्ट सोई झाल्या आहेत. आगगाड्या, आगबोटी, तारायंत्रें,

टपाल या सर्वांपासून व्यापारी लोकांचा किती फायदा होत आहे व होण्यासारखा आहे हें कोणालाही उघड करून सांगायाला पाहिजे असें नाहीं. त्याप्रमाणेंच एकंदर लोकांचेंही वरील यंत्रविद्येपासून किती हित झालें आहे व होण्यासारखें आहे याविषयींही येथें कांहीं लिहिण्याची जरूर नाहीं. त्याप्रमाणेंच मानसिक स्वातंत्र्य हाही या काळांत सर्वांस झालेला एक मोठाच लाभ आहे. मानसिक स्वातंत्र्य ह्मणजे हवा तसा विचार करण्याची व ते विचार वाग्द्वारा किंवा लेखनद्वारा प्रसिद्ध करण्याची मोकळीक. हिंदु राज्यांत या प्रकारची मोकळीक जरी बरीच होती, तरी मुसलमानांच्या राज्यांत या संबंधानें बराच अटकाव होता हें इतिहासप्रसिद्धच आहे. औरंगजेबानें महंमदाची निंदा केल्याबद्दल संभाजी महाराजांची जीभ कापून टाकली, टिपूच्या त्रासानें दोन हजार वैष्णवांनीं एकदम आत्महत्या करून घेतली, इत्यादि प्रकार प्रस्तुत राज्यांत केवळ अश्रुत आहेत. मिशनरींच्या द्वारें परस्पर काम झाल्यास बरेंच असा जरी इंग्रेज सरकारचा अंतस्थ हेतु आहे, तरी उघडपणें खिस्ती धर्माच्या प्रीत्यर्थ कोणाही मनुष्यास या राज्यांत बिलकुल इजा पोंचत नाहीं, व आजपर्यंत पोंचलीही नाहीं. प्रख्यात वक्ता पिट यानें एके ठिकाणीं आपल्या देशच्या राज्यव्यवस्थेची तारीफ करून एके प्रसंगीं असें म्हटलें आहे कीं, "इंग्लिश मनुष्याचें घर हा त्याचा किल्ला आहे." * हीच गोष्ट बऱ्याच प्रकारें आमच्या देशासही लागू झाली आहे. मागें मोगलाईत किंवा पेशवाईत जसें राजानें हवें त्याला उचलून बंदींत टाकावें किंवा त्याचा प्राणही घ्यावा, तसा प्रकार प्रस्तु-

---

* "The proudest Government that exists upon the face of the earth is that of Great Britain. And the great Pitt, her proudest statesman, when he would tell of Britain's crowing glory did not speak as he might have done, of her wide-spread dominion, upon which the sun never sets. He did not speak of martial achievements, of glorious battle-fields, and of splendid naval conflicts. But he said, with swelling breast and kindling eye, that the poorest man of Great Britain in his cottage might bid defiance to all the force of the Crown. It might be frail, its roof might shake, the wind might blow through it, the storm might enter, the rain might enter; but the King of England could not enter it! In all his forces he dared not cross the threshould of that ruined tenement!"

तर्चे राज्य परकी लोकांचें असतांही येथें होऊं शकत नाहीं. हें तर काय, पण टेंपलसाहेबांस एकीकडे मानपत्र मिळतें व एकीकडे प्रत्येक सभासदाच्या हातांत टेंपलशाहीचा इंग्रेजी पोवाडा पडतो; मूरसाहेब आज जकातीचे धारे होयवा रावबहादुरांच्या मान डोलवण्यावरून पास करतात, व दुसऱ्या दिवशीं पुणेंशाही 'छोकऱ्यां' नीं थोडीशी गडबड केली न केली तों 'वृद्ध' मंडळीस सरकारांतून खाशी थप्पड येते, इत्यादि गोष्टींकडे जो कोणी क्षणभर लक्ष पुरवील त्याची अशी खात्री झाल्यावांचून खास राहणार नाहीं, कीं हल्लींच्या राज्यांत आह्मांस जितकें स्वातंत्र्य आहे तितकें यापूर्वी स्वदेशीय राजांच्या उत्कृष्ट कारकीर्दींतही कधीं नव्हतें. त्याप्रमाणेंच आमचे लोकच अत्यंत साहसशून्य व अगदीं पोंचट होऊन गेले आहेत, नाहीं तर या स्थितींतही त्यांचा किती उत्कर्ष होण्यासारखा आहे हेंही बहुधा सर्वांच्या लक्षांत येण्यासारखें आहे!

---

फाराचि वरीं निरयगति परवशता शतगुणें करी जाच।

'विराटपर्व.'

अंक ७८–(१) इंग्रेजी राज्यापासून अहित. (२) स्वातंत्र्यनाश. (३) आक्षेपनिरसन. (४) इंग्रेजी राज्याची आवश्यकता. (५) सध्यांच्या पारतंत्र्यापासून झालेले तोटे.

१. मागील अंकांत प्रस्तुतच्या राज्यापासून आमच्या देशास कोणकोणते फायदे झाले आहेत व होण्यासारखे आहेत ते सांगितले. आतां यांत वरील राज्यापासून आमचें आजपर्यंत काय काय नुकसान झालें व पुढें कितपत होण्यासारखें आहे याविषयीं विचार करूं.

२. इंग्रजी राज्यापासून आमची पहिली मोठी हानि कोणती झाली ह्मणाल तर स्वातंत्र्यनाश. स्वातंत्र्याची स्थिति पारतंत्र्यापेक्षां किती सुखावह असते हें कोणालाही सांगायाला नकोच. यदृच्छेनें अंतरालांत फिरणाऱ्या व वनगहनांत यथेच्छ आहारविहार करणाऱ्या पक्ष्यांत आणि मोठ्या सोन्याच्या किंवा रत्नखचित पिंजऱ्यांत कोंडलेल्या पोपटांत किती अंतर! ज्याचा ईश्वरदत्त अधिकार हा, कीं त्यानें आपल्या सुंदर पक्षांच्या बळावर हवा तिकडे अनिरुद्ध संचार करावा, नानाविध फलांचा रसास्वाद घ्यावा, स्वजनांत राहून संसारसुख अनुभवावें, त्यानें टीचभर जागेंत राहून सदोदित 'लटपटपंची' करीत राहावें ही केवढी दैन्यावस्था! हीच गोष्ट राष्ट्रांसही लागू आहे. वस्तुतः पाहतां ज्या त्या राष्ट्रानें आपापली व्यवस्था ठेवावी, व इतरांशीं जो संबंध ठेवावाचा तो फक्त व्यापाराच्या वगैरे संबंधानें ठेवावा, हा सचोटीचा मार्ग. प्रत्येक गृ-

चार आणि इंग्रेज ग्रंथकारांच्या पेनांतून उतरलेलें ह्मटलें ह्मणजे तें ब्रह्मवाक्यच, त्यांत असत्य ह्मणून लेशमात्रही असायाचें नाहीं, ही बळकट समजूत! ही परम शोचनीय स्थिति उत्तरोत्तर अगदीं पालटत चालली आहे हें पाहून कोणासही संतोष वाटल्यावांचून राहणार नाहीं. तर आमचे देशबंधु जे वर सांगितल्याप्रमाणें अगदींच बहकून गेले होते त्यांस ताळ्यावर आणण्याचा संकल्प योजून आह्मीं कलम हातांत धरलें होतें. तें आतां जरी खालीं ठेवलें तरी हरकत नाहीं असें आम्हांस वाटतें. आमच्या साप्ताब्दिक सत्रांत आह्मीं अनेक दुर्मतांचें सत्यदेवतेच्या प्रीत्यर्थ हनन केलेलें आहे, व 'तक्षकाय स्वाहा इंद्राय स्वाहा' असा वषट्कारही अनेक वेळां उच्चारलेला आहे; तेव्हां वरील सर्व आहुति ज्यांनीं पाहिल्या असतील त्यांस इतःपर अनार्यांच्या कुतर्कांची बाधा सहसा होऊं पावणार नाहीं असें आभिवचन देण्याचें आह्मी धाडस करतों. तर अनेक विषयांवर अनेक दुर्मतें व अनेक दुराग्रह जे आमच्या कानीं पडत असत त्या सर्वांचें खंडन करून लोकांचे त्या त्या प्रकरणीं बरोबर समज करावे हा जो आमचा पुष्कळ दिवसांचा मनोरथ होता त्याचें साफल्य झालें असें समजून 'या आमच्या धनुष्यास तूर्त रजा देण्याचें' आह्मी योजलें!

वरील दुर्मतध्वंसन चाललें असतां आम्हीं आपल्या प्रतिपक्ष्यांस स्वमनप्रतिपादनार्थ नेहमीं आव्हान केलेलें असून त्याप्रमाणें कितीकांची व आमची सदरील पुस्तकांतच चकमक झालेली आमच्या वाचकांस माहीत आहेच. ही पद्धति किती उत्तम आहे हें कोणासही स्पष्ट दिसणारच आहे. नाहीं तर आपणावर कोणीं प्रहार केला असतां तोंडावर बुरखा घेऊन एकाद्या दुसऱ्याच पुस्तकांत किंवा वर्तमानपत्रांत गुप्तपणें प्रवेश करून तेथून आडगोळ्या माराव्या, आणि तशांतही फजिती झाली असतां मग आपल्या गोटांत चोरट्यासारखें पळून यावें, यापेक्षां तालीमबाजी आखाड्यांत जो प्रकार आढळतो तो किती सरळ व किती मर्दुमकीचा आहे! सर्व लोकांसमक्ष दंड ठोकून लढणें हें सत्यासत्याच्या निर्णयास तर अत्यावश्यक व परम भूषणरूप होय. ज्यास आपला पक्ष खरा आहे ही पक्की खातरी वाटते आहे त्याला पडदपोशी व आडपडदा कशाला हावी? तर आमच्या पुस्तकावरून जे जे सिद्धांत आमच्या देशबंधूंच्या मनांत बिंबणारे आहेत ते वरच्यासारख्या स्पष्ट रीतीनें नमूद केले असून त्यांजविषयींची प्रसंगवशात् झालेली चर्चा ही जशी काय चव्हाट्यावर झालेली आहे!

मालामथनाच्या कार्यांत विराम करण्याचें तिसरें कारण असें आहे

कीं, ही मासिक रचना पूर्वीपासूनही श्रमदायक असून आलीकडे तर केवळ दुर्धर झाल्यासारखी झाली आहे. एका महिन्याच्या अवधींत एकट्यानें वरील काम उरकणें म्हणजे किती पंचाइतीचें काम आहे याविषयींची खात्री अनुभविक मनुष्य तर तेव्हांच देईल; पण यापूर्वीं अनेक वेळां जें प्रस्तुत प्रकरणीं लिहिण्यांत आलें आहे, त्यावरून वरील गोष्टीविषयीं कोणाचीही समजूत पडेल असें आम्हांस वाटतें. गेल्या आठ वर्षांत सदरील पुस्तकाचा जो आह्मीं अव्याहत उद्योग केला त्याला आमच्याच देशांत काय, पण पाश्चात्य देशांतही तोड सांपडणार नाहीं असें म्हटलें असतां गर्वोक्ति केल्याचा दोष माथीं येईल असें आम्हांस वाटत नाहीं. मासिक किंवा त्रैमासिक पुस्तकांची कोठेंही स्थिति पाहिली तरी येवढा डोलारा कोणी एकट्यानेंच शिरीं चाळगला आहे असें आह्मांस तर अद्याप कोठें आढळलें नाहीं. केवळ भाषांतररूप किंवा प्रकाशनरूप पुस्तक असलें तर वरील गोष्ट सुसंभाव्य आहे; पण स्वतंत्र निबंधरचनेचा विचार केला असतां ती पद्धति वरच्याहून किती भिन्न आहे हें कोणाच्याही सहजगत्या लक्षांत येणारें आहे. असलें काम ह्मटलें ह्मणजे चारचोघांचे जेव्हां हात लागतील तेव्हां तें उठायाचें ! आज अमक्यानें लिहिलें, उद्यां तमक्यानें लिहिलें, हा विषय एकानें घेतला, दुसरा विषय दुसऱ्यानें घेतला, याप्रमाणें 'दसका लकडी एकका बोजा ' या न्यायानें प्रस्तुत उद्योग उभारला जाऊन चालत असतो. तर हें बहुजनसाध्य कार्य आह्मीं स्वतःच अंगीकारलें असतां त्यांत इतक्या अडचणी आल्या व नें वरचेवर मागें पडत असे या गोष्टीचें वस्तुतः पाहतां कोणास आश्चर्य करण्यास कारण नसून इतक्या विषयांवर इतका काळ पावेतों आह्मीं लेखणी चालविली, आणि कोणापाशीं एक छदाम किंवा एक ओळही न मागतां, अगर मेहेरबान डायरेक्टर साहेब किंवा ट्रान्स्लेटर साहेब यांच्या मेहेरबानीची चिल्कूल फिकीर न करतां हें महासत्र संपवून आज अवभृतस्नानाला मोकळे होणार हीच विशेष गोष्ट असें म्हणण्यास फारशी हरकत दिसत नाहीं. त्यांतून आजपर्यंत वड्या वड्या मंडळींनीं कितीका प्रकारचे मानसिक संकल्प केलेले आहेत, व कितीका प्रकारचे प्रचंड उद्योग हातीं धरून 'आरंभशूर' त्वाच्या प्रसिद्ध सूत्रास मात्र दृढतरत्व आणलें आहे, ही गोष्ट मनांत आणली असतांही आमच्या चतुरशीतिपुष्पमालेकडे पाहून आह्मांसच काय, पण प्रत्येक भाषाहितेच्छूला व देशहितेच्छूला आनंद झाल्याविना राहाणार नाहीं असें आह्मांस वाटतें. आह्मी विद्यार्थीदशेंत असून आंग्ल-

भौमनिर्मित विद्यापर्वतमार्ग क्रमीत असतांही दोहों बाजूंच्या वृक्षलतांच्या पुष्पपल्लवांनीं कित्येक वेळां आकर्षितांतःकरण होऊन मधेंमधें गमत होतों, व विद्यालयांतील सोळा संस्कार लागून स्वतः सिद्ध होत्सातें बाहेर पडतांच वरील वृक्षवाटिकांतच आराम पावून धन्यता जोडायाची हा आमचा कृतसंकल्प होता. पुढें जगदीशकृपेनें तसाच योग घडून येऊन आह्मीं 'टॆंपेस्ट' मधील एरियलाप्रमाणें बंधमुक्त होतांच त्याचाच क्रम स्वीकारला, आणि त्याचें फळ प्रस्तुत पुस्तक हें होय. आमच्या पूर्वींचें विद्वन्मंडळ हें फार झालें तर आपल्या ठिकाणींच आपण रममाण होऊन वरील पुष्पांचा मकरंद सेवीत असे. पण आह्मीं आपल्या देशबंधूंची आठवण करून त्यांस गीर्वाण व आंग्लभौम पुष्पाकरांतील मधु बिंदूंचा व सौरभाचा यथावकाश व यथाशक्ति लाभ करून द्यावा हें मनांत आणलें. विद्यापीठरूप महानीडांतून पांख फुटून भरारी मारल्यास आज आह्मांस दहा वर्षेंच काय तीं झालीं; पण या एका दशकांतच आमचा पूर्वोक्त संकल्प किती सिद्धीस गेला हें पाहून आह्मांस बरेंच समाधान वाटतें, व पुढील काळाकडे नजर दिली असतां खूप उमेद येते. आमच्या वडिलांनीं आह्मांस विद्योपासनसमयींच लेखनप्रविष्ट करून ठेवलेंच होतें, व वरील नीडत्यागाच्या वेळेस तर माजी 'शालापत्रका'चें धुराकर्म त्यांनीं सर्वस्वींच आह्मांवर लोटून दिलें. हें धुरीणत्व चार वर्षेंपावेतों आमच्याकडेच होतें. पुढें विचित्र दैवयोगानें वरील बिचाऱ्या 'पत्रका'ची इतिश्री होण्यास आह्मीच कारण झालों. मुंबईचें 'एज्यूकेशनल रेकर्ड' ह्मणजे रजा व नेमणुका समजण्याचा अखबार जसें होऊन बसलें आहे त्यांच्यापेक्षां 'मराठी शालापत्रका'ची योग्यता कांहीं ज्यास्ती असावी असा आमच्या वडिलांचा संकेत होता; व पुढें अनुभवाही होता. त्याप्रमाणें 'मराठी व्याकरण' व 'कविता' हे दोन्ही उपयुक्त व महत्त्वाचे विषय सदरील पुस्तकाच्या द्वारें पुष्कळ दिवसपर्यंत प्रसिद्ध होण्यांत आले, याखेरीज मधून मधून पुस्तकांवर टीका वगैरे अनेक विषयही येत असत. तेव्हां एकंदरीत पाहतां सदरील पुस्तकाची व्यवस्था आमच्या वडिलांकडे आल्यापासून तें मराठी मास्तरांस ( कीं ज्यांच्याकरतां तें मुख्यतः उपस्थित केलें होतें) बरेंच प्रिय होऊन राहिलें होतें. पण १८७४ सालापासून तें एका जबरदस्त दुष्टग्रहाच्या फेऱ्यांत पडलें, व मनुष्य किंवा होडी भोंवऱ्यांत सांपडली. असतां कालें करून जशी त्यांची गति केंद्रप्रवण होत होत त्यांत त्यांचा शेवटीं लय होतो, त्याप्रमाणेंच पुढील सालापर्यंत वरील ग्रहग्रस्त पुस्तकाची मजल जेमतेम आटपून शेवटीं बुडालें! हा महान् अनर्थ होण्यास कारण काय झालें

म्हणाल, तर पूर्वोक्त कविताविषय. सदरील विषयाचे पूर्वभाग आटपून महाराष्ट्र कवितेवर आह्मी येऊन ठेपलों होतों, व आरंभीं थोडासा उपोद्घात केला होता. या उपोद्घातांत सदरील कवितेचे शत्रु जे मिशनरी त्यांच्या संबंधानें कांहीं मजकूर आला होता. पण येवढेंच कारण ट्रान्स्लेटर [illegible] ख्या मुज्ञ व सद्धर्मी मनुष्याचा पित्तक्षोभ होण्यास बस होऊन [illegible] व डायरेक्टर साहेबांचा खलिता सुटला कीं, असला निबंध या मासिक पुस्तकांत पुनः आला तर खबरदार ! असो; तर या प्रकारें करून 'शालापत्रका'च्या द्वारें आमचा प्रथमतः लेखनसरस्वतीच्या मुलखांत प्रवेश झाला. हा होऊन दोन वर्षे झालीं तों आह्मांस स्वतंत्र पुस्तककर्तृत्वाची हौस वाटून प्रस्तुत मालेचा प्रादुर्भाव झाला. याही गोष्टीस आज आठ वर्षे लोटून गेलीं. इतक्या काळांत प्रस्तुत पुस्तकाच्या संबंधानें किती उलाढाली झाल्या, व तितक्यांतून पार पडून आज स्वतंत्र शाळा, स्वतंत्र छापखाना, स्वतंत्र वर्तमानपत्रें, इत्यादि नवीन सृष्टींत आह्मी कसे येऊन पडलों, हें यापूर्वी आमच्या प्रिय वाचकांस निवेदन केलेलेंच आहे !

